“देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याकरीता सुधारीत विकास आराखडयास” मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक: तीक्षेवि २०१८ /प्र.क्र. ६६ /का.१४४४**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक : १३ नोव्हेंबर, २०१८**

<u>वाचा:</u> १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांकःतीक्षेवि-२००९/प्रक्र २८/का. १४४४, दिनांक २ जून, २००९

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांकःतीक्षेवि-२०१०/प्रक्र १०९/का. १४४४, दिनांक १२ सप्टेंबर, २०१४

३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि २०१५ /प्र.क्र.६ /का.१४४४, दिनांक ४ जून, २०१५.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने “ देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याकरीता रु.१०९४.८९ कोटी इतक्या शासन सहभागाचा तसेच महानगरपालिका/ नगरपालिका/महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांचा रु. ३२.५० कोटी व संस्थांन/देवस्थानाचा रु.९१.३५ कोटी इतका सहभाग असलेला रु. १२१८.७४ कोटी इतक्या किंमतीच्या सुधारीत विकास आराखडयास दि.१२ सप्टेंबर २०१४ रोजी निर्गमित शासन निर्णयान्वये मान्यता दिली. या आराखडयास दि.८ डिसेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.३१ मार्च, २०१९ पर्यंत मुदतवाढ दिली असून आराखडयातील कामे प्रगतीपथावर आहेत.

विभागीय आयुक्त, पुणे यांनी या सुधारीत विकास आराखडयांतर्गत विकास कामे व पालखीतळ याकरीता भूसंपादनासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध होणेबाबत प्रस्ताव सादर केला. या प्रस्तावाची सखोल तपासणी करुन संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये गठित मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीसमोर प्रस्ताव सादर करण्यात आले. उच्चाधिकार समितीने दि.४ सप्टेंबर, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत अतिरिक्त निधीच्या प्रस्तावास मान्यता दिली. मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये गठित शिखर समितीच्या मान्यतेकरीता सदर प्रस्ताव सादर करण्यात आले. शिखर समितीच्या दि. २४ ऑगस्ट, २०१८ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता प्राप्त प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

**देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याकरीता रु. १४२७.८५ कोटी इतक्या किंमतीच्या सुधारीत विकास आराखडयास" प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे**.

२. मान्यता प्राप्त कामे व त्याकरीता निर्धारित निधी याचे तपशिल सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये जोडण्यात आला आहे.

३. राज्यामध्ये सुरू असलेल्या सर्व तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत करण्यात येणा-या विकास कामांकरीता आवश्यकता आहे तेथे भूसंपादन न करता विकास कामे सुरू करण्यात आली असल्याने अशी विकास कामे नियोजित वेळेत पूर्ण करणे शक्य होत नाही. भूसंपादनास विलंब झाल्यास जमिनीच्या किंमतीमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ होऊन त्याच्या परिणामी आराखड्याच्या संपूर्ण अंदाजित किंमतीमध्ये वाढ होते. हे टाळण्याकरिता राज्यामध्ये सुरू असलेल्या सर्व तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत आवश्यक तेथे भूसंपादन प्रक्रीया पूर्ण करून त्यानंतरच विकास कामे सुरू करावीत. देहू आळंदी पंढरपूर विकास आराखड्याबाबत भूसंपादनाच्या जोडीनेच प्रगतीपथावर असलेली विकास कामे सुरू ठेवण्यात यावीत.

४. तीर्थक्षेत्र विकास आराखड्याच्या नियोजनबद्ध अंमलबजावणीसाठी व संनियंत्रणासाठी एक संगणकीय प्रणाली (Computer Software) विकसित करणे, याकरिता आवश्यक असल्यास शासनाच्या संबंधित विषयाबाबतच्या Consultant Firm सूचीमधील सल्लागाराची नियुक्ती करण्याकरीता रू.१५.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करण्यात येत आहे.

५. पालखीतळाकरीता भूसंपादीत तसेच शासकीय जागांचा पालखीच्या वारीदरम्यानच प्रामुख्याने उपयोग होतो. याव्यतिरिक्त वर्षभरात उर्वरीत कालावधीमध्ये या जागांचा सार्वजनिक वापर न झाल्यास अतिक्रमण होण्याची शक्यता राहणार आहे. त्यामुळे होणारे अतिक्रमण टाळण्याकरिता शासकीय तसेच भूसंपादीत जागांभोवती कुंपण करण्यात यावे. वारी व्यतिरिक्त कालावधीकरीता शासकीय व भूसंपादित जागांच्या काही प्रकारचे वाणिज्यिक वापर करता येईल किंवा कसे याबाबत सन्माननीय पालकमंत्री तसेच संबंधित नगराध्यक्ष / सरपंच यांच्याशी चर्चा करून त्यांच्या स्तरावर उचित निर्णय घ्यावा.

६. पालखीतळाकरीता भूसंपादित तसेच शासकीय जागांवर होणारे अतिक्रमण वेळीच रोखण्याकरीता स्थानिक स्वराज्य संस्था व जिल्हाधिकारी, पुणे व सोलापूर यांनी समन्वयाने उपलब्ध अधिकारी / कर्मचारी यांचे नियमित विशेष अतिक्रमण विरोधी फिरते पथक नियुक्त करावे.

७. आराखड्यातील कामांची वाढलेली व्याप्ती लक्षात घेता, " देहू ,आळंदी ,पंढरपूर , भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास

आराखडा (मूळ व सुधारीत) ” यास दि. ३१ मार्च, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. प्रत्येक पालखी मुक्कामाच्या ठिकाणी बांधण्यात आलेल्या कायमस्वरुपी स्वच्छतागृहांच्या देखभाल-दुरूस्तीकरीता यंत्रणा विकसित करण्यात यावी. याबाबत अनुभवी संस्था म्हणून सुलभ इंटरनॅशनल तसेच निर्मलवारी या व याच स्वरूपाच्या इतर संस्थांना संपूर्ण वर्षाकरीता देखभाल व दुरुस्तीसाठी नियुक्त करण्यासंदर्भात विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांनी आवश्यक कार्यवाही करावी. याकरिता ग्राम विकास विभाग, नगर विकास विभाग तसेच इतर यंत्रणांकडून प्राप्त होणा-या निधीतूनच खर्च भागविण्यात यावा.

९. सुधारीत आराखड्याची अंमलबजावणी नियोजन विभागाद्वारे निर्गमित शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५ /प्र.क्र.६/ का.१४४४, दिनांक ४ जुन २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी, पुणे व सोलापूर यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार असेल.

विभागीय आयुक्त तथा संनियंत्रण अधिकारी यांनी

**अ**. सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमुद कामांचे तांत्रिक/ प्रशासकीय मान्यता आदेश निर्गमित करावे.

**ब.** सदर आराखड्यांतर्गत समाविष्ट सर्व कामे दिनांक ३१ मार्च, २०२१ पूर्वी पूर्ण करण्याचे नियोजन करावे.

**क.** सदर आराखड्यातील कामांचा मासिक आढावा घ्यावा.

**ड.** कामाच्या निमित्ताने जिल्हास्तरावरील कोणत्याही अधिकाऱ्यास बोलविण्याचे व त्यांना योग्य त्या सूचना करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना राहतील.

**इ.** आराखड्याची अंमलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक ती सर्व उपाययोजना करावी.

**ई.** आराखड्यातील कामांशी संबंधित सर्व विभागांचे समन्वयन करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे व जिल्हाधिकारी, जि.सोलापूर, पुणे, सातारा यांची राहील.

**उ.** उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामांचा प्राधान्यक्रम निश्चिती व निधीचा उचित विनियोग दृष्टीने आवश्यक ती दक्षता घेण्यात यावी.

**ऊ.** बांधकाम व बांधकामाव्यतिरिक्त कामांसंदर्भात शासनाची प्रचलित मानके व निकषानुसार कामे पूर्ण करावीत.

ए. कामांच्या पुर्णत्वाची खात्री/प्रगती विचारात घेऊन निधी खर्च करण्यात यावा व सदर आराखडा नियोजित वेळेत पूर्ण होईल याची काळजी घ्यावी.

१०. या आराखड्याचे संनियंत्रण विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्याकडे राहिल. त्यांच्याकडील उपलब्ध कर्मचारीवृंदाकडूनच या आराखड्याची अंमलबजावणी करण्यात यावी. मात्र त्याकरिता नव्याने/ स्वतंत्र कर्मचारीवृंद उपलब्ध करण्यात येणार नाही.

११. विकास आराखड्यातील कामांच्या प्रगतीबाबत विभागीय आयुक्त,पुणे विभाग पुणे यांनी त्रैमासिक आढावा घेऊन त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

१२. या आराखड्यातील खर्च "मागणी क्रमांक ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्र (००)(०४) श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर व पालखीतळ क्षेत्र विकास विशेष कृती कार्यक्रम (५४५२ ०१०४) कार्यक्रम (दत्तमत)" या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

१३. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीने दिनांक २४ ऑगस्ट,२०१८ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिल्यानुसार सुधारित प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१८१११३१७२९०७५३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Hampayya
Date: 2018.11.14 17:18:53 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव**

**प्रत तातडीच्या कार्यवाहीसाठी**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे

जिल्हाधिकारी, पुणे,सोलापूर,सातारा.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय,मुंबई-३२
३) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (अन्न व नागरी पुरवठा)तथा पालकमंत्री जिल्हा पुणे यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

६) मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.माबई

७) मा.राज्यमंत्री (जलसंपदा)तथा पालकमंत्री जिल्हा पुणे यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य

९) श्री. संजय भेगडे, मा. विधान सभा सदस्य मावळ, जिल्हा पुणे

१०) मा.महापौर, पुणे महानगरपालिका

११)मा.महापौर, सोलापूर महानगरपालिका

१२)मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद, पुणे

१३)मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद, सातारा

१४) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद, सोलापूर

१५) मा.नगराध्यक्ष, सातारा, नगरपालिका

१६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

१७) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.

१८)अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.

१९) प्रधान सचिव(सा.बां.) सार्वजनिक बांधकाम विभाग/इमारती-३, मंत्रालय, मुंबई.

२०) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग/मोप्र-२, मंत्रालय, मुंबई.

२१) सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

२२) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

२३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

२४)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

२५) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई

२६) उप सचिव,नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय मुंबई

२७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.

२८) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग

२९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

३०) निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

# “देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याकरीता सुधारीत विकास आराखडा”

**शासन निर्णय क्रमांक: तीक्षेवि २०१८ /प्र.क्र. ६६ /का.१४४४, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१८ सोबतचे**

## परिशिष्ट-अ

| (अ) **भूसंपादन -विकास कामांकरीता** (रु. कोटीत) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
| १) **देहु जोडपत्र क्रमांक १** | | | | | |
| १.३ | येलवाडी येथे ९ मीटर रुंदी व १.४ किमीचा लांबीचा रस्ता तसेच देहू ते चाकण रोडपर्यंत २.२० कि.मी.चा रस्ता. खेड हददीतील | ०.०५०७ | ४९.०० | +०.३२ | ४९.३२ |
| १.१ | देहू क्षेत्राच्या पूर्व भागातील मौजे तळवडेपासून विठ्ठलनगर सर्व्हे नं. ८ मधून इंद्रायणी नदीवरून चाकण रोडवरील देहू फाटा ते इंद्रायणी नदीवरील पुलाच्या जोडरस्त्यापर्यंत - एकूण लांबी ४ कि.मी. सर्व्हे नं ७ येथील पूलाचा चाकण तळेगाव रस्त्यापर्यंतचा जोडरस्ता व गाथा मंदिरा पर्यंतचा रस्ता ९ कि.मी. लांबी. | ५.४१३० | | | |
| १.२ | देहू क्षेत्राच्या दक्षिणेकडील मौजे तळवडे पासून अनगडबाबा दर्ग्या जवळून मौजे देहू गट नं. ६२ मधील इंद्रायणी नदीवरील पूलाच्या जोडणाऱ्या अस्तित्वातील रस्त्यास मिळणारा नविन रस्ता एकुण लांबी ३ कि.मी. | २.९१६६ | | | |
| २.३ | देहू महाद्वार कमानी ते आंबेडकर चौक लांबी ४८० मी. | ०.०४९५ | | | |

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|
| २.४ | प्राथमिक आरोग्य केंद्र ते मुख्य देऊळवाडा मंदिर महाद्वार लांबी २४० मी. व १२ मी. रुंदी. | ०.३१९४ | ०.०० | +८.७५ | ८.७५ |
| २.५ | ग्रामपंचायत कार्यालय ते शिवाजी चौक, शिवाजी चौक ते देऊळवाडा तुकाराम महाराज जन्मस्थानवरुन महाद्वारापर्यंत लांबी २७० मी. व १२ मी. रुंद. | | | | |
| २.६ | शिवाजी चौक ते कुंभार आळी चौक लांबी २३० मी. व १० मी. रुंद | | | | |
| २.७ | देऊळवाडा मंदीर महाद्वार ते आंबेडकर चौक लांबी १०० मी. व १५ मी. रुंदी. | | | | |
| ६.१ | वैकुंठगमन स्थान परिसर व विकास - महाद्वार,भक्त निवास, अन्नछत्र, तुकाराम महाराज जीवन संग्रहालय, सभामंडप, चप्पल स्टँड इ.सुविधा करणे तसेच परिसर विकास करणे. | ०.३३७८ | ०.०० | +३.४६ | ३.४६ |
| २.९ | नविन पूल ते गाथा मंदिर रस्ता लंबी ११०० व रुंदी १८ मी. (यापैकी संत तुकाराम महाविदयालय ते जुना गाथा मंदिर स.नं. ९ मधील सतीश काळोखे यांना रक्कम अदा करणेत आलेली आहे.) | १.९८०० | ०.०० | +८.४७ | ८.४७ |
| २.१ | देहू महाद्वार कमानीपासून विठ्ठलनगर हद्दीतून मौजे तळवडे शिवेपर्यंत १.६ कि.मी. लांब व ३० मी. रुंदीचा रस्ता. | १.३८६९ | ०.०० | +१७.५८ | १७.५८ |
| **एकूण देहू भूसंपादन** | | **१२.४५३९** | **४९.००** | **+३८.५८** | **८७.५८** |
| **२) भंडारा डोंगर जोडपत्र क्रमांक ४** | | | | | |
| २.१ | चाकण रस्ता ते भंडारा डोंगर माथ्याचे बांधकाम करणे. | १.३८६९ | ०.०० | +२०.०६ | २०.०६ |
| **एकूण भंडारा डोंगर भूसंपादन** | | **१.३८६९** | **०.००** | **+२०.०६** | **२०.०६** |

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|
| **३) आळंदी जोडपत्र क्रमांक २** | | | | | |
| १.१ | नवीन पूलाजवळ पदपथ करणे २०० मीटर लांबी १५ मीटर रुंदी आर. सी. सी. काम. | ०.५५९४ | | | |
| २.५ (अ+ ब ) | आळंदी पुणे रोड ते धाकटी पादूका ते एस.टी.स्टँड चौक (रुंदी ४५ मी.) | ७.०६४३ | | | |
| २.१ | चाकण चौक ते जकात नाका ते सिध्दबेट १००० मी लांब व १५ मी. रुंद डांबरीकरण करणे. | ०.५३७६ | | | |
| २.७ | लक्ष्मीमाता मंदीर ते मरकळ रोड ७५० मी. लांब १५ मी. रुंद डांबरीकरण करणे. | ०.४००० | ३२.०० | +०.३० | ३२.३० |
| २.६ | भैरवनाथ चौक ते ज्ञानसागर मंगल कार्यालय ४०० मी. लांब १५ मी. रुंद डांबरीकरण करणे. | ०.७७७२ | | | |
| २.८ | विठठल रुकमिणी चौक ते प्राथमिक शाळा नं.४ १००० मी. लांब १२ मी. रुंद डांबरीकरण करणे. | ०.६५९२ | | | |
| ५.२ | वाहनतळ - चाकण चौक (आरक्षण क्र.४) | ०.५८९३ | | | |
| ५.३ | वाहनतळ - वडगाव आळंदी रस्ता (आरक्षण क्र. ६ ) | ०.४७८४ | ०.०० | +३.१० | ३.१० |
| २.१ | प्रदक्षिणा मार्ग विकसीत करणे १२०० x ९.१४ मीटर रुंदी | ०.६७०८ | ०.०० | +१५.०९ | १५.०९ |
| २.३ | एस.टी.स्टँड चौक ते जूना पूल व नविन पूल (रुंदी २४ मी.) | १.१०२६ | ०.०० | +३४.४८ | ३४.४८ |
| २.९ | चाकण चौक ते सिध्दबेट १००० मी. लांब व ९ मी. रुंद डांबरीकरण करणे. | ०.२०४२ | ०.०० | +३.१९ | ३.१९ |
| ५.५ | वाहनतळ - पुणे आळंदी रस्ता (आरक्षण क्र.४३ ) | १.०००० | ०.०० | +२३.३१ | २३.३१ |
| ६.७ | गरुडपार भूसंपादन | ०.०२३८ | ०.०० | +०.८४ | ०.८४ |
| ९.१ | मलनि:सारण | १.०००० | ०.०० | +२.५३ | २.५३ |

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|
| १६ | नवीन काम - मोशी रस्ता ते गोपाळपूर पूल ते केळगाव रस्ता ते चाकण रस्ता लांबी १.५ कि.मी. व रुंदी १८ मी. | २.२६०० | ०.०० | +१२.२६ | १२.२६ |
| १७ | नवीन काम - चाकण चौक ते पदमावती रोड १२ मी. रुंदी पदमावती मंदीर ते भैरवनाथ चौक - १५ मी. रुंदी व २.५० कि.मी. लांबीचा रस्ता. | १.१७९५ | ०.०० | +१९.०३ | १९.०३ |
| १९ | दिघी ते आळंदी रस्त्याचे सहा पदरी रुंदीकरण तसेच अस्तित्वातील रस्त्यांचे विस्तारीकरण व मजबूतीकरण करणे व इतर अनुषंगिक कामे करणे. | ३.६००० | ०.०० | +२३.०८ | २३.०८ |
| | **एकूण आळंदी भूसंपादन** | **२२.१०६४** | **३२.००** | **+१३७.२१** | **१६९.२१** |
| **अ) विकास कामासाठी करावयाचे भूसंपादन एकूण (१)देहू + (२)भंडारा डोंगर + (३) आळंदी** | | **३५.९४७१** | **८१.००** | **+१९५.८५** | **२७६.८५** |

**(ब) पालखीतळासाठी करावयाचे भूसंपादन जोडपत्र क्र. १२** (रु.कोटी)

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|
| **(१)** | **(२)** | **(३)** | **(४)** | **(५)** | **(६)** |
| **(१) जिल्हा सोलापूर, जोडपत्र क्र. १२** | | | | | |
| **१** | नातेपुते | २.३२ | ५.०० | +१.०० | ६.०० |
| | खडूस फाटा (रिंगण) | ०.०० | १.४३ | -१.४३ | ०.०० |
| | पिराची कुरोली | ३.२१ | ०.६० | +१.७२ | २.३२ |
| | भंडीशेगाव | ७.०७ | १.३० | +८.८८ | १०.१८ |
| | ठाकुरबुवाची समाधी (रिंगण) | ०.०० | १.५४ | -१.५४ | ०.०० |
| | बाजीरावची विहीर (रिंगण) | ०.०० | १.५० | -१.५० | ०.०० |
| **एकूण** | | **१२.६०** | **२१.३७** | **+७.१३** | **२८.५०** |

सोलापूर जिल्हयातील मौजे वाखरी येथील प्रस्तावित ४१. ५७ चौरस मीटर क्षेत्राच्या भूसंपादनास व त्यापोटी यापूर्वी निर्धारित रु. १० कोटी रक्कमेमध्ये रु.१२७.७४ कोटी अतिरिक्त तरतूद करुन एकूण रु. १३७.७४ कोटी रक्कम उपलब्ध करुन देण्यास उच्चाधिकार समितीने शिफारस केली होती. तथापि, विभागीय आयुक्त, पुणे यांनी पंढरपूर -अकलुज (जुना अकलूज रस्ता) सोलापूर या करीता रस्ता बांधणीचा प्रस्ताव शिखर समितीच्या माहितीस्तव सादर केला. विभागीय आयुक्त, पुणे यांनी याबाबत स्पष्टीकरण देताना नमूद केले की, जर या रस्त्यास मान्यता प्राप्त झाली तर वाखरी येथील ४१.५७ चौ.मी. क्षेत्राचे भूसंपादन करण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यामुळे या रस्त्याबाबतचा प्रस्ताव उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येत आहे. या पार्श्वभूमीवर मौजे वाखरी येथील ४१.५७ चौ.मी. भूसंपादनाबाबत अंतिम निर्णय मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीचा निर्णय होईपर्यंत राखून ठेवण्यात येत आहे.

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | भूसंपादन करावयाचे क्षेत्र (हेक्टर) | शासन निर्णय दि. १२ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर निधी | शासन निर्णयातीळ मंजूर निधीपेक्षा आवश्यक असणारा अधिक निधी (+) अथवा बचत होणारा निधी (-) | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|
| **(२) पुणे जिल्हा, जोडपत्र क्र १२** | | | | | |
| २ | जेजुरी | ३.६० | १.२१ | +६.७९ | ८.०० |
| | वाल्हे | ६.०० | ०.१९ | +५.५९ | ५.७८ |
| | यवत | ७.०० | ४.०० | -४.०० | ०.०० |
| | सणसर | १०.०० | २.४० | -२.४० | ०.०० |
| | **एकूण** | **२६.६०** | **७.८०** | **५.९८** | **१३.७८** |
| ब(पुणे व सोलापूर जिल्हा पालखीतळासाठी करावयाचे एकूण भूसंपादन | | ३९.२० | २९.१७ | १३.११ | ४२.२८ |
| **विकास कामे व पालखीतळासाठी करावयाचे भूसंपादन (अ+ब)** | | **७५.१५** | **११४.१७** | **२०८.९६** | **३२३.१३** |

**(क) सुधारीत कामांना मंजूरी जोडपत्र क्र. ११**

| जोडपत्रातील अनुक्रमांक | कामाचे नाव | या कामासाठी निर्धारीत एकूण निधी (रु. कोटी) | प्रस्तावित कार्यान्वयीन यंत्रणा | देखभाल दुरुस्ती |
|---|---|---|---|---|
| भाग क्र.४ | नियोजन विभाग, शासन निर्णय दिनांक १२ सप्टेंबर, २०१४ मधील जोडपत्र ११ मधील भाग क्र.४ मधील "जेजूरी, सासवड, बारामती, इंदापूर, नगरपरिषदांकरीता मंजूर प्रत्येकी ५० | रु.२.७५ | विभागीय आयुक्त,पुणे<br><br>जिल्हाधिकारी, पुणे | नगर परिषद |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | सीटची फिरती स्वच्छतागृहे ( एकूण २०० सीटस् ), ४ फिरत्या पाण्याच्या टाक्या, ४ स्लजपंप व १२ ट्रॅक्टर सयंत्रे पुरविणे ही कामे वगळून त्याऐवजी "जेजूरी, सासवड, बारामती, इंदापूर, नगरपरिषदांना ३६ घंटागाडया, ६ ट्रॅक्टर, १ अग्निशमन वाहन पुरविणे" या सुधारीत कामांना रु.२.७५ कोटी या खर्चाच्या मर्यादेत शिखर समितीचे अध्यक्ष तथा मा.मुख्यमंत्री यांनी मान्यता दिली. याबाबत नगरपरिषदनिहाय वाटप पुढीलप्रमाणे असेल- | | | |

| अ क्र | नगर-परिषद | घंटा गाडी | ट्रॅक्टर | अग्नि-शमन वाहन |
|---|---|---|---|---|
| १ | बारामती | १४ | ०२ | ०० |
| २ | इंदापूर | ०४ | ०० | ०१ |
| ३ | सासवड | १० | ०२ | ०० |
| ४ | जेजूरी | ०८ | ०२ | ०० |
| | एकूण | **३६** | **६** | **१** |

Digitally signed by Vidya Hampayya
Date: 2018.11.14 17:19:20 +05'30'

**( विद्या हम्पय्या)**

**उप सचिव**